**उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, शिराळा, जि.सांगली येथील ०९ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

**सार्वजनिक आरोग्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः अपदे-२०२५/प्र.क्र. १०६/पासु-२**

१० वा मजला, संकुल इमारत,
गोकूळदास तेजपाल रूग्णालय आवार, मंत्रालय, मुंबई
तारीखः २८ मे, २०२५

**वाचा:-**

१) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.पदनि-२०२०/प्र.क्र.४४/आरोग्य-३, दिनांक ०७.०६.२०२१.
२) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२४/प्र.क्र.१२४/आरोग्य-४, दिनांक ०१.१०.२०२४.
३) शासन निर्णय, वित्त विभाग क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५.
४) उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांचा प्रस्ताव क्र.उसंआसे/आस्था/कक्ष-३अ/अस्थायी पदे मुदतवाढ/२०२५-२६/९४४३-४५/२०२५, दिनांक ०५.०५.२०२५.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त क्रमांक १ येथील शासन निर्णयान्वये उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, शिराळा, जि.सांगली येथील ०९ अस्थायी पदे निर्माण करण्यात आलेत. उपरोक्त क्र.२ येथील शासन निर्णयान्वये सदर पदांना मुदतवाढ देण्यात आली होती. सदर पदांची यापुढेही आवश्यकता असल्याने सदर पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्या अंतर्गत उपजिल्हा रुग्णालय, शिराळा, जि.सांगली येथील ०९ अस्थायी पदे पुढे चालू ठेवण्याबाबतचा उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर यांच्याकडून प्रस्ताव सादर करण्यात आला आहे.

२. या शासन निर्णयासोबत जोडलेल्या “परिशिष्ट-अ” मध्ये नमूद करण्यात आलेल्या उपजिल्हा रुग्णालय, शिराळा, जि.सांगली येथील ०९ अस्थायी पदांना दिनांक ०१.०३.२०२५ ते दिनांक ३१.०८.२०२५ पर्यंत मुदतवाढ देण्यात येत आहे.

३. सदर अस्थायी पदांचे वेतन पुढील लेखाशिर्षामध्ये खर्ची टाकण्यात यावे आणि हा खर्च सन २०२५-२६ या वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

| अ.क्र. | लेखाशिर्ष |
|---|---|
| १ | मुख्य लेखाशिर्ष “२२१०-वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य, (०१)(०९)-महाराष्ट्र आरोग्य विकास प्रकल्पांतर्गत ग्रामीण/कुटीर रुग्णालयांचे उप जिल्हा रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (अनिवार्य) (२२१० ४६२४)” |

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या क्र.पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क., दिनांक ०३.०३.२०२५ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे. सदर पदे व्यपगत झाले नसल्याची खात्री करण्यात आली आहे.

५. सदर पदांना यापुढील कालावधीकरीता मुदतवाढ देण्याबाबतचा प्रस्ताव सादर करताना या सोबतच्या “परिशिष्ट-अ” मधील तक्त्यात प्रत्येक आरोग्य संस्थेचे नाव, एकूण मंजूर पदे, स्थायी पदे व अस्थायी पदे (तपशिलवार माहिती) याबाबतच्या माहितीसह शासनास सादर करण्यात यावा.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०५२८१४२७३४३०१७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

MAHESH MADHUKAR LAD

Digitally signed by MAHESH MADHUKAR LAD
DN: cn=MAHESH MADHUKAR LAD, o, ou, email=mahesh.lad@nic.in, c=US
Date: 2025.05.28 14:51:43 +05'30'

( महेश लाड )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. महालेखापाल (लेखा परिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/ नागपूर.

२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. सहसंचालक, आरोग्य सेवा, रूग्णालये (राज्यस्तर), मुंबई.
४. सहसंचालक, आरोग्य सेवा (अर्थ व प्रशासन ), मुंबई.
५. उपसंचालक, आरोग्य सेवा, कोल्हापूर मंडळ, कोल्हापूर.
६. जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रूग्णालय, सांगली.
७. उपजिल्हा रुग्णालय, शिराळा, जि.सांगली.
८. जिल्हा कोषागार अधिकारी, सांगली.
९. वित्त विभाग ( कार्यासन /व्यय-१३), मंत्रालय, मुंबई.
१०.निवडनस्ती ( आरोग्य-४ ), सा.आ.वि.

# “परिशिष्ट-अ”

(शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.अपदे-२०२५/प्र.क्र.१०६/पासु-२,
दिनांक २८.०५.२०२५ सोबतचे विवरणपत्र)

| अ.क्र. | आरोग्य संस्थेचे नाव | एकूण मंजूर पदे | स्थायी पदे | अस्थायी पदे |
|---|---|---|---|---|
| १ | उपजिल्हा रुग्णालय शिराळा, सांगली | ०९ | ०० | वैद्यकीय अधिकारी शस्त्रक्रिया गट -अ (१ पद)<br>वैद्यकीय अधिकारी, गट-अ (स्त्रीरोग व प्रसुतीशास्त्र) (१ पद)<br>वैद्यकीय अधिकारी बधिरीकरण, गट-अ (१ पद)<br>वैद्यकीय अधिकारी, गट-अ (भिषक) (१पद)<br>वैद्यकीय अधिकारी (बालरोगतज्ञ), गट-अ (१ पद)<br>सहाय्यक अधिसेविका, गट-क (१ पद)<br>परिसेविका, गट-क (२ पदे)<br>वरिष्ठ लिपीक,गट -क (१ पद)<br>**एकूण ९ पदे** |